**केंद्रीय लोकसेवा आयोगामार्फत निवड होणाऱ्या भारतीय प्रशासकीय सेवांमध्ये महाराष्ट्रातील अधिकाऱ्यांचे प्रमाण वाढावे यासाठी <u>गुणवत्ताधारीत विशेष शिष्यवृत्ती योजना....</u> प्रशिक्षण संस्था निवडीबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रीआय-४९१६/प्र.क्र.२८१/मशि-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक: २२ जानेवारी, २०१९.

<u>वाचा</u> :- (१) शासन निर्णय क्र.स्कॉलर-५४१५/प्र.क्र.१९२/मशि-२, दिनांक १६.०४.२०१६.
(२) शासन निर्णय क्र.स्कॉलर-४९१६/प्र.क्र.२८१/मशि-२, दिनांक १३.११.२०१७.
(३) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.उशिसं-२०१८/४९१/ श्रीराम संस्था/प्रशा-३/५९, दि. ०२ जानेवारी, २०१९ व दि. १५ जानेवारी, २०१९.

<u>प्रस्तावना :-</u>

संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, केंद्रीय लोकसेवा आयोगामार्फत निवड होणाऱ्या अखिल भारतीय सेवांमध्ये महाराष्ट्रातील अधिकाऱ्यांचे प्रमाण वाढावे यासाठी, केंद्रीय लोकसेवा आयोगाची मुख्य परीक्षा उत्तीर्ण होऊन मुलाखत फेरीपर्यंत पोहोचणाऱ्या, तथापि अंतिमत: भारतीय प्रशासकीय सेवेमध्ये निवड न होणाऱ्या राज्यातील होतकरु व गुणवान उमेदवारांना दिल्ली येथील नामांकित खाजगी प्रशिक्षण संस्थांमध्ये प्रशिक्षण घेण्यासाठी शिष्यवृत्तीच्या माध्यमातून अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यासाठी गुणवत्ताधारित विशेष शिष्यवृत्ती योजना सुरु करण्यात आली आहे. संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, सदर शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निवड झालेल्या उमेदवारांना प्रशिक्षण देण्याकरिता दिल्ली येथील श्रीराम आय.ए.एस. या खाजगी नामांकित संस्थेस कॅलेंडर वर्ष २०१७ व २०१८ करिता मान्यता देण्यात आली होती. सदर संस्थेसोबत दिनांक ३१.१२.२०१८ पर्यंतच्या कालावधीसाठी करार करण्यात आला होता. सदर कराराची मुदत संपुष्टात आल्यामुळे व दिल्ली येथील ३ खाजगी नामांकित संस्था उपलब्ध न होऊ शकल्याने, संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांनी संदर्भाधीन क्र.३ येथिल पत्रांन्वये श्रीराम आय.ए.एस. या संस्थेची मान्यता कॅलेंडर वर्ष २०१९ करीता सुरु ठेवण्याची शिफारस केली आहे. सदर शिष्यवृत्ती योजनेच्या लाभापासून संबंधीत पात्र उमेदवार वंचित राहू नये यासाठी, दिल्ली येथील श्रीराम आय.ए.एस. या खाजगी नामांकित संस्थेसोबतच्या दिनांक ३०.१०.२०१७ रोजीच्या करारातील अटी व शर्ती कायम ठेऊन, श्रीराम आय.ए.एस. या

संस्थेची मान्यता कॅलेंडर वर्ष २०१९ करीता सुरु ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये, गुणवत्ताधारीत विशेष शिष्यवृत्ती योजनेअंतर्गत निवड झालेल्या उमेदवारांना प्रशिक्षण देण्याकरिता दिल्ली येथील श्रीराम आय.ए.एस. या खाजगी नामांकित संस्थेस कॅलेंडर वर्ष २०१७ व २०१८ करिता देण्यात आलेली मान्यता, कॅलेंडर वर्ष २०१९ करीता सुरु ठेवण्यास यान्वये शासन मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार श्रीराम आय.ए.एस. या खाजगी नामांकित संस्थेसोबतच्या दिनांक ३०.१०.२०१७ रोजीच्या करारातील अटी व शर्ती कायम ठेऊन, कराराचा कालावधी दि. ३१ डिसेंबर, २०१९ पर्यंत वाढविण्यात यावा.

२. संदर्भाधीन क्र.१ येथील शासन निर्णयामध्ये विहित केलेले निकष, पात्रता, अटी व शर्ती गुणवत्ताधारीत विशेष शिष्यवृत्ती योजनेसाठी लागू राहतील.

३. प्रस्तुत योजनेच्या प्रभावी अंमलबजावणीसाठी समन्वय अधिकारी म्हणून संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई यांची नियुक्ती करण्यात येत असून, त्यांना उक्त शिष्यवृत्ती योजनेकरिता आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. पात्र उमेदवारांनी या संदर्भातील माहिती www.siac.org.in या संकेतस्थळावरुन घ्यावी व अर्ज करण्याकरिता संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, मुंबई (दूरध्वनी क्रमांक ०२२-२२०७०९४२) यांच्याकडे संपर्क साधावा.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०१९०१२२१५४८२३३४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Hariram V Parhate

Digitally signed by Hariram V Parhate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher And Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8bfd656b321bf6c348564562d46cd2934b62b770484625206559a2c204e56cb8, serialNumber=d01f16685aedf1abc9cfd58347280b4c4cb8d304afd1d413884ef4d91aa1462d, cn=Hariram V Parhate
Date: 2019.01.22 15:50:46 +05'30'

**( ह. व्यं. पऱ्हाते )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधापनपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,

२) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
३) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल, मुंबई,
४) मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
६) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
८) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
९) प्रधान सचिव (वित्तीय सुधारणा), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११) महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे,
१२) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई (५ प्रतींसह),
१३) निवासी आयुक्त व सचिव, महाराष्ट्र सदन, नवी दिल्ली,
१४) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
१५) सर्व विभागीय सह संचालक, उच्च शिक्षण (संचालक, उच्च शिक्षण, पुणे यांच्यामार्फत)
१६) संचालक, राज्य प्रशासकीय व्यवसाय शिक्षण संस्था, हजारीमल सोमानी मार्ग, मुंबई-०१.
१७) संचालक, भारतीय प्रशासकीय सेवा परीक्षा पुर्व प्रशिक्षण केंद्र, कोल्हापूर/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती.
१८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१९) अधिदान व लेखा अधिकारी, बांद्रा (पूर्व), मुंबई,
२०) विधिमंडळ ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (१० प्रतींसह),
२१) मा. मंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
२२) मा. राज्यमंत्री (उच्च व तंत्र शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२३) सर्व मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२४) मा. मुख्य सचिव यांचे उपसचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई,
२५) सचिव (उच्च व तंत्र शिक्षण) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई,
२६) उप सचिव (म.शि.), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२७) कार्यासन अधिकारी (मशि-३), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई,
२८) निवड नस्ती-मशि-२.